**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोंदीत पात्र बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety kit) पुरविण्याच्या सुधारित योजनेस शासन मान्यता देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: इबांका-०६२५/प्र.क्र.८३/काम-७**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ जून, २०२५

**वाचा-**

१. इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६

२. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) नियम, २००७

३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६

४. नियोजन विभाग शासन निर्णय डिसीटी २३१६/प्र.क्र.१३३/का.१४१७ दि.०५.१२.२०१६ व दि.०३.३.२०१७

५. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.इबांका-२०१७/प्र.क्र.४८३/ काम-७, दिनांक २३.११.२०१७

६. शासन पत्र क्र.इबांका-२०२१/प्र.क्र.८४/कामगार-७, दिनांक ०१.१०.२०२४

७. मंडळ बैठक दि.२६.०३.२०२५ रोजीचा ठराव क्र. ६२ (१९)/२०२५

८. मंडळ कार्यालयाचे पत्र क्र.७३३-अ/२०२५, संचवा-२०२५/प्र.क्र.३९/ योजना-०४, दिनांक ०२.०४.२०२५

९. शासन पत्र क्र.इबांका-०४२५/प्र.क्र.४९/काम-७, दिनांक ०८.०४.२०२५

१०. मंडळ कार्यालयाचे पत्र क्र.११९७/२०२५ संचवा-२०२५/प्र.क्र.३९/ योजना-०४ दि.१२.०६.२०२५

**प्रस्तावना :-**

इमारत व इतर बांधकाम क्षेत्रात काम करणाऱ्या कामगारांच्या रोजगाराचे व सेवाशर्तींचे नियमन करण्यासाठी तसेच बांधकाम कामगारांची सुरक्षा, आरोग्य आणि त्यांच्याकरीता कल्याणकारी उपाययोजना करण्यासाठी केंद्र शासनाने इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार विनियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६ लागू केला आहे. इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती नियमन) अधिनियम, १९९६ मार्फत बांधकाम कामगारांची सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना यांची अंमलबजावणी केली जाते. उक्त अधिनियमाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने इमारत व इतर

बांधकाम कामगार (रोजगार विनियमन व सेवाशर्ती) केंद्रीय नियम, १९९८ पारित केले आहेत. त्यास अनुसरुन इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार विनियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६ च्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार विनियमन व सेवाशर्ती) नियम, २००७ प्रसारीत करण्यात आलेले आहेत. उक्त अधिनियमाच्या कलम १८ अन्वये राज्यात महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाची स्थापना करण्यात आली आहे.

राज्यातील इमारत व इतर बांधकाम क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या कामगारांची मंडळामार्फत नोंदणी करण्यात येत असून त्यांना मंडळामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांचे लाभ दिले जातात. त्यास अनुसरुन महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळांतर्गत राज्यातील नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगारांकरीता सुरक्षा संच (Safety Kit) पुरविणे या योजनेस संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती.

मंडळांतर्गत बांधकाम कामगारांकरीता सुरक्षा संच वाटप ही यापूर्वी सुरु असलेली योजना शासनाच्या संदर्भाधीन क्र.६ च्या पत्रान्वये संपुष्टात आली आहे. तद्नंतर मंडळांतर्गत नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगारांना वितरीत करावयाच्या सुधारित सुरक्षा संच योजना सुरु करण्यास मंडळाच्या दिनांक २६.०३.२०२५ रोजीच्या बैठकीत ठराव पारित करण्यात आला आहे. तसेच महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाने नोंदणीकृत बांधकाम कामगारांकरीता सुधारित सुरक्षा संच (Safety Kit) वाटपासाठी तांत्रिक समिती गठीत करण्याबाबत संदर्भ क्र.८ येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन शासनाच्या संदर्भ क्र.९ च्या पत्रान्वये मंडळाकडील नोंदणीकृत बांधकाम कामगारांकरीता सुधारित सुरक्षा संच (Safety Kit) वाटपासाठी सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रिक समिती गठीत केली आहे.

त्यानुषंगाने सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांनी संदर्भ क्र.१० च्या पत्रान्वये मंडळाने बांधकाम कामगारांकरीता सुधारित सुरक्षा संच (Safety Kit) वितरण योजनेबाबत केलेला ठराव आणि मंडळाकडील नोंदीत सक्रिय (जिवीत) बांधकाम कामगारांकरीता वितरीत करावयाच्या सुधारित सुरक्षा संच (Safety Kit) पुरवठा योजनेस मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety Kit) पुरविणे या सुधारित योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाकडील नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety Kit) पुरविणे या सुधारित योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**<u>योजनेच्या अटी व शर्ती:-</u>**

१. मंडळाकडील नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगार या योजनेचा लाभ घेण्यासाठी पात्र राहतील. या पात्रताधारक कामगारांनी विहित नमुन्यातील मागणी अर्ज प्राधिकृत प्रभारी कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/सरकारी कामगार अधिकारी, जिल्हा कामगार सुविधा केंद्र (सर्व) यांच्याकडे भरुन दिल्यानंतर त्यांना सुरक्षा संच (Safety Kit) पुरविण्यात यावे.

२. पात्र बांधकाम कामगारांना पुरवावयाच्या सुरक्षा संच (Safety Kit) मध्ये खालील वस्तूंचा समावेश असावा.

(१) सुरक्षा हार्नेस बेल्ट (Safety Harness), (२) सुरक्षा बुट (Safety Shoes), (३) कानासाठी सुरक्षा प्लग (Ear Plug), (४) मुखपट्टी (Mask), (५) रिफ्लेक्टीव्ह जॅकेट (Reflective Jacket), (६) शिरस्त्राण (Helmet), (७) सुरक्षा हातमोजे (Safety Gloves), (८) सुरक्षा गॉगल (Safety Goggles), (९) मच्छरदाणी (Mosquito Net), (१०) पाण्याची बाटली (Water Bottle), (११) स्टीलचा जेवणाचा डब्बा (Steel Tiffin Box), (१२) सौर टॉर्च (Solar Torch), (१३) प्रवासी बॅग (Travel Kit Bag)

३. मंडळांतर्गत नोंदीत सक्रिय (जिवित) बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety Kit) पुरविण्याबाबत ई-निविदा पध्दतीने प्रक्रिया राबविण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्याकरीताच्या ई-निविदा प्रक्रियेअंती नोंदणीकृत, नामांकीत व अनुभवी संस्थेच्या निवडीबाबतचा प्रस्ताव मंडळाने शासनास सादर करावा. तसेच, या संपूर्ण प्रक्रियेकरीता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींचे काटेकोर पालन करण्यात यावे.

४. नोंदणीकृत बांधकाम कामगारांना वितरीत करण्यात येणाऱ्या सुधारित सुरक्षा संच (Safety Kit) मधील वस्तूंचे दर, पुरवठा, वाहतूक, वितरण व सर्व करांसह निश्चित करण्यात यावे.

५. सुरक्षा संच (Safety Kit) च्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी सुरक्षा संच (Safety Kit) मधील वस्तूंच्या दर्जाची शासनमान्य प्रयोग शाळेकडून तपासणी व खात्री करून घ्यावी व तसे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच अशा वस्तूंची पात्र लाभार्थ्यास वितरणाची कार्यवाही करावी.

६. प्रभारी कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/सरकारी कामगार अधिकारी, जिल्हा कामगार सुविधा केंद्र (सर्व) यांनी रितसर प्रमाणित केलेल्या पात्र नोंदीत बांधकाम कामगारांच्या यादीनुसारच विहीत मुदतीचे आत सुरक्षा संच (Safety Kit) चा पुरवठा करण्यात यावा.

७. पात्र बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety Kit) प्राप्त झाल्याचे प्रभारी सहायक कामगार आयुक्त/सरकारी कामगार अधिकारी, जिल्हा कामगार सुविधा केंद्र (सर्व) यांनी खात्री करावी व पुरवठा केल्याची पोचपावती प्रभारी अपर कामगार आयुक्त/ कामगार उपायुक्त/प्रादेशिक कार्यकारी अधिकारी (विभाग स्तर) यांना सादर करावी. प्रभारी अपर कामगार आयुक्त/ कामगार उपायुक्त/प्रादेशिक कार्यकारी अधिकारी (विभाग स्तर) यांनी अशा सर्व लाभार्थ्यांचे साहित्य प्राप्त

झाल्याबाबतच्या पोचपावत्या पाहून खात्री करुन त्याबाबतचा अहवाल देयकाची अदायगी करण्याच्या प्रमाणपत्रासह महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांना सादर करावा व महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाने सदरहू अहवाल व त्याबाबतचे देयक अदायगी करण्याचे प्रमाणपत्र तपासून त्याबाबतची खात्री झाल्यानंतर पुरवठादाराची देयके नियमानुसार प्रदान करावीत.

८. नोंदणीकृत बांधकाम कामगारांना वितरीत करण्यात येणाऱ्या सुरक्षा संच (Safety Kit) पुरवठयाचा खर्च मंडळाकडील जमा उपकर निधीतून भागविण्यात यावा.

९. सदर योजनेची परिणामकारक अंमलबजावणी व देखरेखीचे काम सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांनी पहावे.

१०. पात्र बांधकाम कामगारांना सुरक्षा संच (Safety Kit) पुरवठा करण्याची कार्यवाही महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाने निश्चित केलेल्या कालावधीत पूर्ण करावी. उक्त कालावधी वाढविण्यास मान्यता देण्याबाबतचे सर्वस्वी अधिकार शासनास राहतील.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१८१५३६१०५११० असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2025.06.18 15:37:09 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई.
२. मा.सभापती, महाराषट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा , विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व विधीमंडळ सदस्य
५. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधानमंडळ, मुंबई.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मुंबई.
११. विकास आयुक्त, असंघटीत कामगार, मुंबई.

१२. कामगार आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रलय, मुंबई.
१४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराषट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
१६. निवड नस्ती.